नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत नवीन शासकीय गोदाम बांधकामांना निधी उपलब्ध करून देणेबाबत.
(सन २०२१-२२)

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदाबां १०२१/प्र.क्र.१३०/नापु-१६ ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १८ फेब्रुवारी, २०२२.

वाचा:-
१. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०२०/प्र.क्र.१३६/नापु-१६-ब, दि.०१.०४.२०२१.
२. समक्रमांक शासन निर्णय दि.१८.०८.२०२१ व दि.२५.०१.२०२२.

प्रस्तावना-

उक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या नवीन शासकीय गोदाम बांधकामांना निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

प्रशासकीय मान्यतेसंबंधित संदर्भाधीन शासन निर्णयातील नमूद अटींच्या अधीन राहून पुढील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे नवीन शासकीय गोदाम बांधकामांना निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | प्रशासकीय मान्यतेच्या आदेशानुसार अंदाजित खर्च (₹) | यापूर्वी वितरीत करण्यात आलेला निधी (₹) | सदर आदेशान्वये उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी (₹) |
|---|---|---|---|---|---|---|
| १) | नाशिक | निफाड | मौजे पिंपळगाव बसवंत | ८२८४७६१७ | १०८३७२५८ | ४५२७३६१ |
| २) | नाशिक | नांदगाव | नांदगाव | ६८३५११२५ | ९३८७६१० | ४५२७३६१ |
| ३) | नाशिक | येवला | अंगणगाव | ७३५०२६३६ | ९९०२७६१ | ४५२७३६१ |
| ४) | नाशिक | नाशिक | मौजे राजूरबाहुला, शासकीय धान्य गोदाम क्र.०१ | १०१६०९८०४ | १२७१३४७७ | ४५२७३६१ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ५) | नाशिक | नाशिक | मौजे राजूरबाहुला, शासकीय धान्य गोदाम क्र.०२ | ९३६६८८७५ | ११९१९३८५ | ४५२७३६१ |
| ६) | नाशिक | नाशिक | मौजे राजूरबाहुला, शासकीय धान्य गोदाम क्र.०३ | ९३६६८८७५ | ११९१९३८५ | ४५२७३६१ |
| ७) | नाशिक | मालेगाव | मौजे चंदनपुरी शासकीय धान्य गोदाम क्र.१ | ११०२८५८०४ | १३५८१०७७ | ४५२७३६१ |
| ८) | नाशिक | मालेगाव | मौजे चंदनपुरी शासकीय धान्य गोदाम क्र.२ | ११०२८५८०४ | १३५८१०७७ | ४५२७३६७ |
| एकूण | | | | **७३४२२०५४०** | **९३८४२०३०** | **३६२१८८९४** |
| **(अक्षरी रुपये:- तीन कोटी बासष्ट लक्ष आठरा हजार आठशे चौऱ्याण्णव फक्त)** | | | | | | |

२. उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने सुरु करण्यात यावीत.

**३ संबंधित गोदामांसाठी मंजूर केलेला निधी प्रत्यक्ष खर्ची होताच निधीच्या विनियोगाचे उपयोगिता प्रमाणपत्र त्वरीत शासनास सादर करण्याची दक्षता संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी, नाशिक यांनी घ्यावी.**

४. बांधकामास विलंब अथवा इतर कारणांनी गोदाम बांधकामाचा खर्च वाढीव होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

५. सदर गोदाम बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

६. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबतची खातरजमा

करावी. काही त्रुटी राहिल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरीक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

७. हे आदेश प्राप्त होताच सदरील तरतुद जिल्हाधिकाऱ्यांमार्फत तात्काळ सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित कार्यकारी अभियंता यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात यावी. धनादेशाने आहरीत करण्यात येऊ नये.

**८. सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी दिनाक २८ फेब्रुवारी, २०२२ अखेर खर्ची टाकावा. या आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी ठेव अंशदान म्हणून वर्ग करता येणार नाही.**

९. संबधित गोदाम बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता आदेशानुसारच्या छाननीअंती सुधारित अंदाजित खर्चापेक्षा अधिक निधी वितरित होणार नाही याबाबत संबधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. वितरीत करण्यात आलेले अनुदान दिनाक २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत खर्च करण्यात यावे. दिनाक २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यत निधी खर्च न झाल्यास अन्य गोदाम बांधकामास वळती करण्यात येईल. याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांची राहील, याची नोंद घ्यावी.

१०. उपरोक्त खर्च **"मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष '४४०८, ०२ अन्न, साठवण व वखार यावरील भांडवली खर्च, ०२, साठवण व वखार साठवण १०१, ग्रामीण भागात गोदाम बांधणे कार्य्रक्रम (०१) नविन गोदामाचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम करणे (मुफसल) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे"** या लेखाशिर्षातर्गत व सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

११. वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ च्या भाग-१ उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास प्राप्त झालेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१८१६३८४०२९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Deodatta Tungar

Digitally signed by Sudhir Deodatta Tungar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b555e4e3006da7480655b52484794686f18de73c0aa909267b188c86a755c75, pseudonym=5E1F07FF6933630D1833271F4B68D3392A0A1127, serialNumber=204E151470E2D21694C51F66F9B5A8FAAE544D15F6BFA4851335010591835680, cn=Sudhir Deodatta Tungar
Date: 2022.02.18 16:40:14 +05'30'

**( सुधीर तुंगार )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी, नाशिक.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई व नाशिक.
३. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
४. उप आयुक्त ( पुरवठा ), नाशिक.
५. जिल्हा पुरवठा अधिकारी, नाशिक.
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-१०, अर्थोपाय, अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
१३. सहाय्यक संचालक (संगणक) लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.
१४. उपमहाव्यवस्थापक,नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे- ४११००५.
१५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१६. निवड नस्ती/नापु-१६ब.